**बेलोरा, जि.अमरावती येथील विमानतळाचा विस्तार/विकास करण्यासाठी वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय:क्रमांक अेव्हीएन-१००८/प्र.क्र.६७७/२८-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक: ३१ ऑगस्ट २००९.

**वाचा:-** १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग समक्रमांक दि.२७ फेब्रुवारी २००९
२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्रमांक- पूरक १००९/प्र.क्र.८३/२००९/ पंचवीस, दि. ८ जुलै २००९.

**प्रास्ताविक :** संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक २७ फेब्रुवारी २००९ अन्वये महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांचे मार्फत सार्वजनिक खाजगी सहभागातून बांधा, वापरा व हस्तांतरीत करा (बी.ओ.टी) या तत्वावर बेलोरा, जिल्हा अमरावती येथील सध्याच्या विमानतळाचा पूर्ण क्षमतेने विस्तार/ विकास करण्यासाठी आणि अनुषंगिक बाबींकरिता प्रशासकीय मान्यता दिली आहे. सदर विमानतळाच्या विस्तार/विकासासाठी वित्तीय मान्यता देणे आणि याप्रित्यर्थ महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांना सहाय्यक अनुदान मंजूर करण्यासंबंधीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

२. महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित मार्फत सार्वजनिक-खाजगी सहभाग तत्वावर (बी.ओ.टी.) बेलोरा, जिल्हा अमरावती येथील सध्याच्या विमानतळाचा पूर्ण क्षमतेने विस्तार/ विकास करण्यासाठी आणि याप्रित्यर्थ एकूण रु.२७९.३१ कोटी प्रकल्प खर्चासाठी व सदर प्रकल्प खर्चापैकी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांना खाली नमुद केल्याप्रमाणे टप्याटप्याने एकूण रु.६४.३३ कोटी सहाय्यक अनुदान मंजूर करण्याकरिता व सदर रु.६४.३३ कोटी सहाय्यक अनुदानापैकी चालू आर्थिक वर्षी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांना एकूण रु.१० कोटी (रुपये दहा कोटी फक्त) सहाय्यक अनुदान मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे.

| अनुक्रमांक | बाब | रुपये कोटी |
|---|---|---|
| १. | **विमानतळ जमीन संपादन –** | |
| (अ) | विमानतळ विस्तार/विकासाकरिता ४४० हेक्टर जमिनीचे संपादन | ४८.८४ |
| (ब) | ४ टक्के मुद्रांक शुल्क, १ टक्का नोंदणी शुल्क, १ टक्का मोजणी शुल्क | २.९३ |
| (क) | भुसंपादन, प्रशासकीय विक्री | १.४७ |
| २. | **विमानतळ धावपट्टी विस्तार** | |
| (अ) | वळण रस्त्याकरिता २०.३० हेक्टर जमिनीचे संपादन | २.२५ |
| (ब) | ४ टक्के मुद्रांक शुल्क, १ टक्का नोंदणी शुल्क, १ टक्का मोजणी शुल्क | ०.१४ |
| (क) | भुसंपादन, प्रशासकीय विक्री | ०.०७ |
| ३. | वळण रस्त्याचे बांधकाम | ८.६३ |
| | **एकूण (१ ते ३)** | **६४.३३** |

३. या प्रकरणी उपरोक्त रु.१० कोटी (रुपये दहा कोटी फक्त) मंजूर केलेली सहाय्यक अनुदानाची रक्कम महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांना अदा करण्यासाठी सहाय्यक संचालक, विमान चालन संचालनीलय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि संचालक, विमान चालन संचालनालय,मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यांत येत आहे. सदर एकूण रु.१० कोटी सहाय्यक अनुदान मासिक निधी वितरण प्रणालीनुसार वितरित करण्यांत यावे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी या प्रकरणीचा विहीत अहवाल शासन आणि महालेखापालांना सादर करावा.

४. याप्रित्यर्थचा चालू आर्थिक वर्षातील खर्च सन २००९-२०१० च्या अंदाजपत्रकामध्ये खालील लेखाशीर्षा अंतर्गत मंजूर तरतुदीतून भागविण्यांत यावा आणि त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा. याप्रित्यर्थच्या खर्चाचा मासिक प्रगती अहवाल शासन आणि महालेखापालांना सादर करावा.

मागणी क्रमांक- ए-७
३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळे,
१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य- राज्य योजना
(००) (०२) महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस विमानतळाच्या विकासाकरिता सहाय्यक अनुदान (३०५३०१६४)
३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर )

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने सदर विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५०६/०९/व्यय-४, दिनांक २६ ऑगस्ट २००९अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २००९०८३११६४३३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( रा.तु.जाधव )
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व मा. मंत्री आणि मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकस कंपनी मर्यादित, मुंबई,
अपर मुख्य सचिव ( महसूल/ वने ) , महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,

प्रधान सचिव ( वित्त ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव ( नियोजन ) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव ( उद्योग ) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव ( विमानचालन) ,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई,
विभागीय आयुक्त, अमरावती,
जिल्हाधिकारी, अमरावती,
संचालक/सहाय्यक संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू, मुंबई
उप सचिव ( विमानचालन) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
महालेखापाल -१/ २ ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र ,मुंबई/ नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.